सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने
६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना देण्यात यावयाच्या
अनुदानाचे वाटप. मागणी क्र. एल ३ , २४१५ - (०३) (०२)
मुख्य लेखाशिर्ष-२४१५ ०६२४.
(माहे ऑगस्ट ते डिसेंबर,२०१९) (दुसरा हप्ता)

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा-२०१९/प्र.क्र. ६३ /आस्था-१५**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०३ ऑक्टोबर,२०१९.

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८.
३) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास विभाग अनुग्रा-२०१९/प्र.क्र. ६३/आस्था-१५, दिनांक १३ मे, २०१९.

**शासन निर्णय-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र. एल ३, मुख्य लेखाशिर्ष "२४१५ - (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, संकेतांक क्रमांक २४१५ ०६२४" ३१ सहायक अनुदान (वेतनेतर), ३६ सहायक अनुदान (वेतन) या लेखाशिर्षाखाली ६ शासकीय ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी (जि. पुणे), कसबाबावडा (जि.कोल्हापूर), जालना (जि. जालना), परभणी (जि. परभणी), बुलढाणा (जि. बुलढाणा) व सिंदेवाही (जि. चंद्रपूर) यांना वेतनेतरकरिता रु. ६०.०० लक्ष (रु. साठ लक्ष) व वेतनासाठी रु.५००.३५ लक्ष (रु. पाच कोटी, पस्तीस हजार) असे रु.५६०.३५ लक्ष (रु. पाच कोटी, साठ लक्ष, पस्तीस हजार) इतकी तरतूद अर्थसंकल्पित केली आहे.

२. त्यापैकी, माहे एप्रिल ते जुलै, २०१९ करिता वेतनेतरसाठी रु.१९.५० लक्ष (रु. एकोणीस लक्ष, पन्नास हजार) व वेतनासाठी रु. १८९.८७ लक्ष (रु. एक कोटी, एकोणनव्वद लक्ष, सत्याऐंशी हजार) असे एकूण रु. २०९.३७ लक्ष (रु.दोन कोटी, नऊ लक्ष, सदोतीस हजार) इतक्या रकमेचे अनुदान दिनांक १३ मे, २०१९ च्या शासन निर्णयान्वये ६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र यांचेकरीता उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

३. आता, माहे ऑगस्ट ते डिसेंबर, २०१९ या प्रथम नऊमाहीकरीता वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जुलै, २०१९ अन्वये अर्थसंकल्पित निधीच्या एकूण वार्षिक तरतूदीच्या ६०% या मर्यादेनुसार वेतनेतरसाठी रु.१६.५० लक्ष ( रु. सोळा लक्ष, पन्नास हजार ) व वेतनासाठी रु.११०.३४ लक्ष (रु. एक कोटी, दहा लक्ष, चौतीस हजार ) असा एकूण रु १२६.८४ लक्ष (रु. एक कोटी, सहवीस लक्ष,चौऱ्याऐंशी हजार ) इतका निधी दुसरा हप्ता म्हणून वितरीत करण्यात येत आहे. सदरहू अनूदान ६ शासकीय प्रशिक्षण केंद्राना सोबत जोडलेल्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे वितरित करण्यात येत आहे.

४. प्रशिक्षण केंद्रांना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण-११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने सर्व संबंधित उपायुक्त (आस्था) यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भात दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रांनी खर्च करावा.

५. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे , त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. हा खर्च मागणी क्र.एल ३,"२४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण" (पी) (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र संकेतांक क्र. (२४१५ ०६२४) ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन) व ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो या लेखाशीर्षातंर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे , त्याबाबतचा ताळमेळ घेऊन त्याबाबत खातरजमा करुन शासनास कळविण्याबाबत विभागीय आयुक्तांनी संबंधितांना सूचना द्याव्यात . सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना), हे काम पाहतील.

७. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रांस अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले

जाणार नाही याची दक्षता घ्यावी . तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतनेतर व वेतनाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे. याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतनाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

८. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना , प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाच्या दि.०८ जुलै, २०१९ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे संबंधितांनी काटेकोरपणे पालन करावे.

९. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

१०. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जुलै, २०१९ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१००११७०४०७२५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Shashank Yashwant Barve
Date: 2019.10.03 13:14:08 +05'30'

(शशांक य. बर्वे)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. विभागीय आयुक्त, पुणे, नागपूर, अमरावती, औरंगाबाद (प्रत्येकी २ प्रती)

२. उप आयुक्त (आस्था) विकास शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे, नागपूर, अमरावती,

औरंगाबाद.

३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, कोल्हापूर, बुलढाणा, जालना, परभणी, चंद्रपूर

४. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१, मुंबई

५. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर

६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे

७. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था ( "यशदा") बाणेर रोड, पुणे

८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थसं-१७/व्यय-१५

९. प्राचार्य,ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी फार्म, पुणे/कसबा बावडा, कोल्हापूर /जालना/ परभणी/ सिंदेवाही जि. चंद्रपूर/बुलढाणा

१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७, ग्राम विकास विभाग, मुंबई- ४०० ००१

११. निवड नस्ती का. क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.

परिशिष्ट

| शासन निर्णय क्र.अनुग्रा-२०१९/प्र.क्र. ६३/आस्था-१५,दि. ०३ ऑक्टोबर,२०१९ | | | | |
|---|---|---|---|---|
| माहे ऑगस्ट ते डिसेंबर, २०१९ या कालावधीतील दुसऱ्या हप्त्याचे वितरण (रु. लाखात) | | | | |
| अ.क्र. | ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्राचे नाव | वेतनेतर | वेतन | एकूण |
| १ | मांजरी फार्म, पुणे | २.७५ | १९.९३ | २२.६८ |
| २ | कसबा बावडा, कोल्हापूर | २.७५ | १९.९३ | २२.६८ |
| **अ** | **विभागीय आयुक्त, पुणे** | **५.५०** | **३९.८६** | **४५.३६** |
| ३ | जालना | २.७५ | १९.९३ | २२.६८ |
| ४ | परभणी | २.७५ | १९.९३ | २२.६८ |
| **ब** | **विभागीय आयुक्त, औरंगाबाद** | **५.५०** | **३९.८३** | **४५.३६** |
| ५ | सिंदेवाही, चंद्रपूर | २.७५ | १०.६९ | १३.४४ |
| **क** | **विभागीय आयुक्त, नागपूर** | **२.७५** | **१०.६९** | **१३.४४** |
| ६ | बुलढाणा | २.७५ | १९.९३ | २२.६८ |
| **ड** | **विभागीय आयुक्त, अमरावती** | **२.७५** | **१९.९३** | **२२.६८** |
| | एकूण (अ+ब+क+ड) | १६.५० | ११०.३४ | १२६.८४ |

Digitally signed by
Shashank Yashwant Barve
Date: 2019.10.03 13:15:18
+05'30'

( शशांक य. बर्वे )

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.